**<u>केंद्र पुरस्कृत योजना सन २०२१-२२</u>**
**“व्याघ्र प्रकल्प” योजनांतर्गत सह्याद्री व्याघ्र प्रकल्पाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०१.२२/प्र. क्र. ०७/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०१ फेब्रुवारी, २०२२.

<u>वाचा :-</u>

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोबर, २०२१.
४. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१ (३९)/२०२१-पीटी, दिनांक १० डिसेंबर, २०२१.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक - कक्ष- १/सी/यो/प्र.क्र.१२/STR/११६/२०२१-२२, दिनांक १२ जानेवारी, २०२२.

<u>प्रस्तावना :-</u>

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना “व्याघ्र प्रकल्प” अंतर्गत सह्याद्री व्याघ्र प्रकल्पाकरीता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना अंतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता एकुण रु. ४९३.२६ लक्षचे कार्यबाबींस केंद्र शासनाने मंजूरी प्रदान करुन केंद्र हिस्स्याचा प्रथम हप्ता म्हणून रु. १९४.७१ लक्ष तर त्या अनुरुप राज्य हिस्सा म्हणून रु. १७५.२३ लक्ष असे एकूण रु. ३६९.९४ लक्ष निधी वितरीत करण्यास मंजूरी प्रदान केली आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

सबब आता सदर शासन निर्णयान्वये संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर **रु. २९५.९६ लक्ष निधी** सोबत जोडलेल्या विवरणपत्रान्वये खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) व्याघ्र प्रकल्प या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सह्याद्री व्याघ्र प्रकल्पाच्या विकासात्मक कामांसाठी होणारा खर्च **I)** अनावर्ती बाबींसाठी केंद्र हिस्सा ६०% करीता रु. ४६.७३ लक्ष लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०४) व्याघ्र प्रकल्प (६०% केंद्रीय अनुदान) (२४०६ १२४३) **II)** त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % करीता रु. ३१.१५ लक्ष

लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१०२) III) आवर्ती बाबींसाठी रु. १०९.०४ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(२३) व्याघ्र प्रकल्प (५० % केंद्रीय अनुदान) (२४०६ ए१२२) IV) त्या अनुरुप ५० % राज्य हिस्सा रु. १०९.०४ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२४) व्याघ्र प्रकल्प (५० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१३१) सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर व सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

इ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ई) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

उ) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोबर, २०२१ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६/१४७५, दिनांक १०.०१.२०२२ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९/व्यय-१०, दिनांक १७.०१.२०२२ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०११३२८४०४०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2022.02.01 14:57:10 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*********

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी : ०१.२२/प्र.क्र. ०७/फ-१, दिनांक : ०१ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे विवरणपत्र.**

**(रु. लाखात)**

| लेखाशिर्ष (सर्वसाधारण घटक) | | २४०६-१२४३ | २४०६-A१०२ | २४०६-A१२२ | २४०६-A१३१ |
|---|---|---|---|---|---|
| उद्दिष्ट | ०२-मजूरी | १०.०० | ६.६७ | ६०.२६ | ६०.२६ |
| | १७-संगणक खर्च | ०.७५ | ०.५० | ०.०० | ०.०० |
| | २१-पुरवठा व सामग्री | ४.०४ | २.६९ | ०.०० | ०.०० |
| | २६-जाहिरात व प्रसिध्दी | ४.६५ | ३.१० | ०.०० | ०.०० |
| | २७-लहान बांधकामे | २.२९ | १.५३ | ३.१८ | ३.१८ |
| | ५०-इतर खर्च | २५.०० | १६.६६ | ४०.९८ | ४०.९८ |
| | ५१-मोटर वाहने | ०.०० | ०.०० | ४.६२ | ४.६२ |
| **एकूण** | | **४६.७३** | **३१.१५** | **१०९.०४** | **१०९.०४** |

********